प्रादेशिक पर्यटन विकास योजना तयार करणे
व योजनेची अंमलबजावणी प्रभावीपणे
करण्याबाबत.

महाराष्ट्र शासन,
गृह विभाग
शासन निर्णय क्र. एमटीसी २००३/१२/प्र.क्र.६०४/पर्यटन,
मंत्रालय,मुंबई- ४०० ०३२, दिनांक ९ जानेवारी, २००४.

**वाचा:-** शासन निर्णय, समाज कल्याण, सांस्कृतिक कार्य, क्रिडा व पर्यटन विभाग,
क्र. एमटीसी १०९०/प्रक्र.८८/पर्यटन, दिनांक २३ एप्रिल, १९९०.

**शासन निर्णय:-** महाराष्ट्राला सुमारे ७२० कि.मी. लांबीचा समुद्रकिनारा लाभला असून ऐतिहासिक वारसा स्थळे व किल्ले, विविध आकर्षक निसर्गरम्य स्थळे, पुरातन वास्तु, लेण्या, तिर्थस्थळे इत्यादी विविध पर्यटन स्थळे आहेत. ही पर्यटन स्थळे पर्यटकांना पाहता यावीत व महाराष्ट्रीय संस्कृतीचा परिचय व्हावा किंवा असलेला परिचय वृध्दींगत व्हावा या दृष्टीकोनातून पर्यटनास चालना मिळणे आवश्यक आहे व लोकांमध्ये पर्यटनाची आवड निर्माण व्हावी यासाठी पर्यटनाच्या ठिकाणी पायाभूत सुविधा निर्माण होणे आवश्यक आहे. यासाठी पर्यटनास "उद्योगाचा" दर्जा देण्यात आलेला आहे. त्याचप्रमाणे शासन निर्णय, गृह विभाग, दिनांक १६.९.२००२ नुसार "New Package Scheme of Incentives for Tourism Projects - २०००" ही योजना जाहीर केली आहे.

२. शासन निर्णय, समाज कल्याण, सांस्कृतिक कार्य, क्रिडा व पर्यटन विभाग, क्र. एमटीसी १०९०/प्र.क्र.८८/पर्यटन, दिनांक २३ एप्रिल, १९९० अन्वये जिल्हा स्तरावर पर्यटनविषयक विकासाची कामे त्वरेने हाती घेण्याकरिता व प्रस्तावाची अंमलबजावणी प्राधान्याने व्हावे म्हणून जिल्हाधिकारी यांच्या अध्यक्षतेखाली खालीलप्रमाणे समिती स्थापन केली आहे:-

| | |
|---|---|
| १) जिल्हाधिकारी | अध्यक्ष |
| २) मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद | सदस्य |
| ३) विभागीय वन अधिकारी | सदस्य |
| ४) कार्यकारी अभियंता सार्वजनिक बांधकाम विभाग (राज्य) | सदस्य |
| ५) कार्यकारी अभियंता, पाटबंधारे विभाग (राज्य) | सदस्य |
| ६) जिल्हा नियोजन अधिकारी | सदस्य |
| ७) विभागीय व्यवस्थापक, महाराष्ट्र पर्यटन विकास महामंडळ. | सदस्य |
| ८) निवासी उपजिल्हाधिकारी | सदस्य-सचिव |

३. पर्यटन उद्योगास चालना मिळावी तसेच वरील समितीच्या माध्यमातून पर्यटन विकासाच्या कामांची अंमलबजावणी प्राधान्याने व सातत्याने व्हावी या दृष्टीकोनातून संबंधित विभागीय आयुक्तांनी पुढील पाच वर्षाचा कालावधी लक्षात घेऊन एक प्रादेशिक पर्यटन विकास योजना जिल्हाधिका-यांच्या सहकार्याने तयार करावी. यासाठी आवश्यकतेनुसार तज्ञ सल्लागाराचीही मदत घेण्यात यावी. प्रादेशिक पर्यटन विकास योजना तयार करताना खालील बाबींचा विचार करण्यात यावा:-

१) ऐतिहासिक व वारसा स्थळांचे जतन करणे. त्याचप्रमाणे लोककला व हस्तकला यांचे जतन करणे.
२) पर्यटन विकासाचे माध्यमातून रोजगार निर्मितीस वाव तयार करणे.
३) पर्यटन स्थळांपर्यन्त जाण्यासाठी योग्य रस्ते तयार करणे.
४) पर्यटन स्थळांच्या ठिकाणी पिण्याचे पाणी उपलब्ध करणे.
५) पर्यटन स्थळांच्या ठिकाणी आवश्यकते विद्युतीकरण करणे.
६) वैद्यकीय सुविधा निर्माण करणे.
७) पर्यटनाच्या ठिकाणी पर्यटक निवास, हॉटेल्स् इ. सुविधा निर्माण करणे.
८) इको टुरिझम योजना राबविणे.
९) लोकांमध्ये पर्यटनाची आवड निर्माण करणे. यासाठी शाळा, महाविद्यालये, संस्था यांचा सहभाग करुन घेणे व प्रसिध्दी माध्यमातून प्रचार व प्रसार करणे. मार्गदर्शिका/माहिती पुस्तिका तयार करणे. फलक लावणे इत्यादी.
१०) जलक्रिडा केंद्रातून पर्यटनाचा विकास साधणे.
११) स्थानिक युवकांना/आदिवासी युवकांना गाईड म्हणून प्रशिक्षित करणे.
१२) खाजगी संस्थांचा सहभाग करुन घेणे.

४. विभागीय आयुक्तांनी प्रादेशिक पर्यटन विकास योजना तयार केल्यानंतर सदर योजनेला शासनाची मान्यता देण्यासाठी खालीलप्रमाणे राज्य स्तरावर समिती गठीत करण्यात येत आहे.

| | |
|---|---|
| मा.मंत्री (पर्यटन) | अध्यक्ष |
| मा.राज्यमंत्री (पर्यटन) | उपाध्यक्ष |
| प्रधान सचिव (पर्यटन) | सदस्य |
| विभागीय आयुक्त | सदस्य |
| उप सचिव (पर्यटन) | सदस्य |
| उप आयुक्त (विकास) आयुक्त कार्यालय | सदस्य सचिव |

५. वर नमूद केल्याप्रमाणे प्रादेशिक पर्यटन विकास योजना तयार करताना व त्याची अंमलबजावणी करताना खालील बाबींवर खर्च करणे अपेक्षित आहे:-

१) तज्ञ सल्लागाराची नियुक्ती करुन आराखडे तयार करणे.
२) पर्यटन स्थळाच्या ठिकाणी पायाभूत विकासाच्या योजना तयार करणे.
३) प्रसिध्दी माध्यमातून लोकांना पर्यटनासाठी चालना देणे.

शासन निर्णय, वित्त विभाग, क्रमांक विअप्र १०००/प्र.क्र.४६/२००१/विनियम, दिनांक ११ जुलै २००१ सोबत जोडलेल्या वित्तीय अधिकार नियम पुस्तिका, १९७८ भाग पहिला उप विभाग पाच अंतर्गत नियम १३४ नुसार किरकोळ नागरी बांधकामाना प्रशासकीय मंजूरी देण्याचे अधिकार विभाग प्रमुख/प्रादेशिक कार्यालय प्रमुख यांना पाच लाखांपर्यन्त प्रदान करण्यात आले आहेत त्यास अनुसरुन पर्यटन विकासाची कामे प्रभावीपणे करण्यासाठी जिल्हाधिकारी यांना खालीलप्रमाणे प्रशासकीय मंजूरी देण्याचे अधिकार देण्यात येत आहेत:-

जिल्हाधिकारी - रु. ५ लाख मर्यादेपर्यन्त खर्चास मंजूरी देणे. ( बाबनिहाय)

५. ३४५२-पर्यटन या प्रधान लेखाशिर्षाखाली स्टेट सेक्टर अंतर्गत पुढील उप लेखाशिर्षाखाली निधीची तरतूद करण्यात आली आहे.

(०२) पंचवार्षिक योजनांतर्गत योजना-राज्य योजनांतर्गत योजना
(०२)(०४) प्रसिध्दी (३४५२ ०९५ १)
(०२)(१८) पर्यटन विकासासाठी विविध मुलभूत पायाभूत-
सुविधाकरिता अनुदान (३४५२ १७७ १)

६. विभागीय आयुक्तांनी शिफारस केल्याप्रमाणे, जिल्हाधिका-यांना आवश्यक तो निधी वरील लेखाशिर्षाखाली थेट वितरीत करण्यात येईल. वितरीत करण्यात आलेल्या निधीचा विनियोग करणे व खर्चावर नियंत्रण ठेवणे यासाठी **जिल्हाधिकारी यांना नियंत्रण अधिकारी** म्हणून घोषित करण्यात येत आहे. त्याचप्रमाणे **निवासी उपजिल्हाधिकारी यांनाही आहरण व संवितरण अधिकारी** म्हणून घोषित करण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

( र. य. नेलावडे )
अवर सचिव, गृह विभाग, महाराष्ट्र शासन.

प्रति,

विकास आयुक्त, कोकण विकास सुधारीत कार्यक्रम व अपर मुख्य सचिव(गृह),
विकास आयुक्त, विदर्भ विकास सुधारीत कार्यक्रम व प्रधान सचिव (गृहनिर्माण),
सर्व विभागीय आयुक्त,
सर्व जिल्हाधिकारी,
सर्व मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद,
व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र पर्यटन विकास महामंडळ, मुंबई,
सर्व विभागीय व्यवस्थापक, महाराष्ट्र पर्यटन विकास महामंडळ, मुंबई,

महालेखापाल ( लेखा व अनुज्ञेयता/ लेखा परीक्षा)/ नागपूर, मुंबई,
अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई,
निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई,
महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई,
ग्राम विकास व जलसंधारण विभाग, मंत्रालय, मुंबई,
नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई,
सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई,
सामाजिक न्याय, सांस्कृतिक कार्य, क्रिडा व विशेष सहाय्य विभाग, मंत्रालय, मुंबई
वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई,